होमगार्ड संघटनेतील जिल्हा समादेशकांच्या
प्रवास भत्त्याची मर्यादा वाढविणेबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग [विशेष],
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
शासन निर्णय क्रमांक एचजीएस-३६८९/१०५१/सीआर-३६/विशा-८,
दिनांक २७ ऑगस्ट, १९९१.

वाचा:- १] शासन निर्णय, गृह विभाग क्रमांक एचजीएस-७६६५/५१६६/रोमन सात, दिनांक १५ एप्रिल, १९६६.

२] महासमादेशक, होमगार्डस, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. ४२८५/लेखा/सी.जी. दिनांक २५ मे, १९८९.

शासन निर्णय:- होमगार्ड संघटनेतील जिल्हा समादेशकांच्या प्रवासभत्त्याची वार्षिक रक्कम रु.१८००/- च्या मर्यादेपर्यन्त शासन निर्णय, गृह विभाग क्रमांक एचजीएस-७६६५/५१६६/रोमन सात, दिनांक १५ एप्रिल, १९६६ अन्वये शासनाने मंजूरी दिलेली आहे. त्याबाबत पुनर्विचार करुन जिल्हा समादेशकांच्या प्रवासभत्त्याची वार्षिक रक्कम रु. ५०००/- [रुपये पाच हजार फक्त] च्या मर्यादेपर्यन्त वाढविण्यास शासन मंजूरी देत आहे.

२. जिल्हा समादेशकांना परिच्छेद-१ मध्ये नमूद केलेल्या वार्षिक प्रवासभत्त्याच्या मर्यादेपेक्षा जास्त प्रवासभत्ता अनुज्ञेय होणार नाही.

३. हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.सीआर-२०१/९१/व्यय-८, दिनांक १४.८.१९९१ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

सही/-
[ श्रीमती शु.सु. पिंपळे ]
कार्यासन अधिकारी, गृह विभाग [विशेष], महाराष्ट्र शासन.

प्रति,
महासमादेशक, होमगार्डस, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
महालेखापाल [लेखा व अनुज्ञेयता], महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
महालेखापाल [लेखा परिक्षा] महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
सर्व जिल्हा कोषागारे अधिकारी,
सर्व जिल्हा समादेशक, होमगार्डस,
वित्त विभाग [व्यय-८],
निवडनस्ती.